# गवतातील वर्तुळ

लेखक: जॉन बियरहॉर्स्ट; चित्रे: डायन आणि लिओ डिलन





- मराठी अनुवाद: सुशील मेन्सन

एका गर्द, घनदाट जंगलात पुष्कळ पशुपक्षी राहात होते. तिथे *वॉपी* नावाचा एक तरूण शिकारीसुद्धा राहात होता. वॉपी शब्दाचा अर्थ आहे, पांढरा ससाणा. वॉपी अंगापिंडाने भलताच उंच आणि बळकट होता. त्याच्या डोळ्यात तारुण्याचा सळसळता उत्साह तरळत असे. तो गर्द जंगलातून निर्भयपणे चालत-फिरत असे. तो सगळ्या पशु-पक्ष्यांची पदचिन्हे अचूकपणे ओळखू शकत असे. दररोज तो एकातरी पशुपक्ष्याची शिकार करून घरी परतत असे. तो आपल्या जमातीच्या टोळीतील एक कुशल आणि प्रसिद्ध शिकारी होता.

एकदा तो शिकारीसाठी घरापासून नेहमीपेक्षा जास्त दूर गेला. शिकार केल्यावर तो जंगलातील अशा ठिकाणी पोहोचला, जिथून दूरदूरचा परिसर दृष्टिच्या टप्प्यात येत होता. थोड्याच वेळात, त्याला झाडांच्या मधून झिरपत येत असलेला प्रकाश दिसू लागला. लवकरच तो एका गवताळ मैदानानजिक पोहोचला. या मैदानात बरीच फुलेही उमलली होती.



गवतात एकही पायवाट दिसत नव्हती. मग तो गवतावरूनच चालू लागला. अचानक त्याला गवतात एक वर्तुळ दिसले. ते कदाचित वर्तुळाकार मार्गाने चालणाऱ्या लोकांच्या पदचिन्हांनी बनले होते.

पण त्या वर्तुळापर्यंत जाणारी पायवाट किंवा पदचिन्हे मात्र दिसत नव्हती. अगदी मोडून पडलेली एखादी फांदी किंवा कुणीतरी पायाखाली तुडवलेले पानही तिथे दिसत नव्हते.



त्या विचित्र वर्तुळाचे गूढ जाणून घेण्यास वॉपी उत्सुक झाला. म्हणून तो जवळच्या उंच गवतात लपून वाट पाहू लागला. काही वेळाने त्याला आभाळात हलकीशी संगीतधुन ऐकू येऊ लागली. त्याने वर पाहिले तेव्हा आभाळातून काहीतरी खाली येतेय, असे त्याला दिसले. सुरुवातीला ते एका बारीक ठिपक्यासारखे दिसले आणि मग वेगाने मोठे होत गेले. थोड्याच वेळात, त्याला एक विशाल टोपली दिसली. त्यात बारा अतिशय सुंदर बहिणी बसल्या होत्या.

टोपली जसजशी जवळ येत गेली तसतसे संगीत आणखी मधुर आणि स्पष्ट होत गेले. टोपली जमिनीवर उतरली तसे साऱ्या बहिणी त्यातून उड्या मारून बाहेर आल्या आणि त्या वर्तुळावर नाचू लागल्या. त्या गोल-गोल नाचत फिरू लागल्या आणि नाचत-नाचत वर्तुळाच्या मध्यभागी ठेवलेल्या एका चमकत्या चेंडूला छडीने बडवू लागल्या. चेंडूला एखाद्या ढोलला बडवावे तसे त्या बडवत होत्या.

वॉपी गवताआडून त्यांचा नाच बघू लागला. त्यांचा नाच पाहून तो प्रभावित झाला.





पण सर्वात धाकट्या बहिणीच्या नाचाने त्याला सर्वाधिक मोहीत केले. न राहावून, शेवटी तो लपलेल्या जागेवरून बाहेर आला आणि सर्वात धाकट्या बहिणीला पकडण्याचा प्रयत्न करू लागला. पण सर्व बहिणी पक्ष्यांच्या चपळाईने उड्या मारून टोपलीत शिरल्या आणि वर आभाळात निघून गेल्या.

“निघून गेल्या त्या,” वाईट वाटून तो मनाशी म्हणाला, “आता मला त्या पुन्हा कधी दिसणार नाहीत बहुधा.” तो घरी परतला, पण त्याचे मन थाऱ्यावर नव्हते.



पुढल्या दिवशी, थोडं लवकरच तो त्या वर्तुळाकडे गेला. वर्तुळापासून थोडेसे दूर त्याला एका जुनाट झाडाच्या खोडाचा बुंधा दिसला. त्यात बरेच उंदीर होते. या छोट्या जीवांना त्या सुंदर बहिणी घाबरणार नाहीत, असे वाटून त्याने तो बुंधा वर्तुळाजवळ आणला.



मग स्वत:चे रुपांतर उंदरात करून तोसुद्धा बुंध्यात जाऊन बसला. थोड्या वेळाने त्या बहिणी पुन्हा आभाळातून खाली आल्या आणि नाच करू लागल्या.

“हे काय!” सर्वात धाकटी बोलू लागली.



"हा बुंधा कुठून आला! काल तर नव्हता इथे." घाबरून ती टोपलीकडे पळाली. इतर बहिणी तिला हसू लागल्या आणि बुंध्याभोवती गोल करून उभ्या राहिल्या. मग त्या बुंध्याला आपल्या छडीने बडवू लागल्या. त्यामुळे वॉपीसह, त्यातील सर्व उंदीर, बाहेर आले. काही क्षणातच बहिणींनी सर्व उंदीर मारून टेकले. फक्त एक सोडून! त्या उंदराच्या मागे सर्वात धाकटी बहीण धावू लागली. त्याला मारायला तिने आपली छडी हवेत उगारताच, उंदरातून अचानक वॉपी प्रकट झाला. त्याने तिला आपल्या बाहुंमध्ये धरले. इतर अकरा बहिणी घाबरून उड्या मारून टोपलीत बसल्या आणि आभाळात निघून गेल्या.





आपल्या होणाऱ्या या पत्नीला खुश करण्यासाठी, तिचे प्रेम मिळवण्यासाठी वॉपीने भरपूर प्रयत्न केले. त्याने तिच्या डोळ्यांतील अश्रू पुसले. त्याने तिला आपल्या शिकारीच्या साहसकथा ऐकवल्या आणि पृथ्वीवरील आकर्षक जीवनाबद्दल सांगितले.

तिचे लक्ष वेधून घेण्याचे त्याने खूप प्रयत्न केले. मोठ्या प्रेमाने संवाद साधत तो तिला आपल्या घराकडे घेऊन गेला. तिने घरात प्रवेश करताच, त्याचे मन आनंदाने भरून आले आणि त्या क्षणापासून तो जगातील सर्वात आनंदी माणूस बनला.

हिवाळा आणि उन्हाळा एकामागोमाग आले आणि गेले. त्यांना एक गोंडस मूल झाले आणि त्यांच्या आनंदात भर पडली. पण वॉपीची पत्नी एका ताऱ्याची मुलगी होती. तिला पृथ्वीवरील जीवनाचा कंटाळा येऊ लागला तसे तिला वडिलांकडे जावेसे वाटू लागले. आभाळात वर जाण्याचा मंत्र अद्याप ती विसरली नव्हती. वॉपी शिकार करायला बाहेर जात असे तेव्हा ती लपूनछपून सुकलेल्या फांद्यांची एक टोपली बनवत असे. वॉपी घरी असे तेव्हा ती ही टोपली लपवून ठेवत असे. दरम्यान, तिच्या वडिलांना आवडतील अशा वस्तू आणि आकर्षक खाद्यपदार्थही तिने जमा करून ठेवले.





तिची टोपली पूर्ण तयार झाल्यावर एकदा ती आपल्या मुलाला सोबत घेऊन वर्तुळाजवळ गेली. दोघे टोपलीत बसले आणि ती मंत्राचे गाणे म्हणू लागली. तिच्या गाण्याची धुन वाऱ्यासोबत वॉपीच्या कानावर गेली. ही धुन त्याच्या चांगलीच परिचयाची होती. त्वरीत तो गवताळ मैदानाकडे धावला. पण तिथे पोहोचला तेव्हा आपली पत्नी आणि मूल टोपलीतून आभाळात वर जात असल्याचे त्याला दिसले. त्याने त्यांना हाक मारली, पण त्याचा काही उपयोग झाला नाही. टोपली उंच उंच जाऊ लागली. मग टोपली त्याला एका ठिपक्यासारखी दिसू लागली आणि शेवटी दिसेनाशी झाली. अत्यंत दुःखी चेहऱ्याने तो मान खाली करून बसला.

पत्नी आणि मुलाच्या विरहाने वॉपी शोक करू लागला. संपूर्ण हिवाळा आणि उन्हाळा ऋतूत तो दु:खात चूर होता. त्याला पत्नीच्या विरहापेक्षा मुलाच्या विरहाचे तीव्र दःख झाले. यादरम्यान, त्याची पत्नी ताऱ्यांच्या दुनियेत तिच्या घरी पोहोचली. तिथल्या आनंदी वातावरणात ती पृथ्वीवरील आपल्या पतीलादेखील विसरली. आपल्या मुलाकडे बघितल्यावर तिला कधीतरी त्याची आठवण येई. मुलगा मोठा झाला तेव्हा त्याला आपली जन्मभूमी पाहाण्याची तीव्र इच्छा झाली.





एके दिवशी तारा आपल्या मुलीला म्हणाला, “जा मुली, तुझ्या मुलाला आपल्या पित्याकडे घेऊन जा. तुझ्या पतीला सांग की वर येऊन आमच्यासोबत राहा. पण तो ज्या पशुपक्ष्यांची शिकार करतो त्या प्रत्येकापैकी एक पशुपक्षी इथे घेऊन यायला सांग त्याला.”

ताऱ्याची मुलगी आपल्या मुलाला घेऊन पुन्हा पृथ्वीवर आली. वॉपी वर्तुळापासून फार दूर नव्हता. त्याने आभाळातून खाली येणाऱ्या पत्नीचा आवाज ऐकला. पत्नीला आणि मुलाला पाहून त्याचे हृदय धडधडू लागले. ते उतरल्यावर त्याने त्या दोघांना आपल्या मिठीत घेतले.



पत्नीने त्याला ताऱ्याने वर बोलावल्याचे सांगितले. वॉपी उत्साहाने वर नेण्यासाठी भेटवस्तू गोळा करू लागला. रात्रंदिवस तो सुंदर, असामान्य पशुपक्ष्यांचा शोध घेऊ लागला. त्याने त्या पशुपक्ष्यांच्या शेपट्या, नख्या, पिसे वगैरे सांभाळून ठेवले. संपूर्ण तयारी झाल्यावर वॉपीचे कुटुंब वर्तुळाजवळ आले आणि टोपलीत बसून आभाळात वर गेले.



त्यांना पाहून ताऱ्यांना खूप आनंद झाला. ताऱ्यांच्या प्रमुखाने सर्वांना मेजवानीसाठी आमंत्रण दिले. मेजवानीला आल्यावर त्याने प्रत्येकाला पृथ्वीवरून आलेल्या भेटवस्तूंपैकी आवडलेली वस्तू निवडून घेण्यास सांगितले.

पण तेव्हाच काही गोंधळ झाला. काहींनी पंजा निवडला, काहींनी पिसे, काहींनी शेपटी तर काहींनी नखे. ज्यांनी शेपटी आणि पंजे निवडले त्यांचे रुपांतर त्या त्या पशुंमध्ये झाले आणि ते पळून गेले. इतरांचे रुपांतर पक्ष्यांमध्ये झाले आणि ते उडून गेले. वॉपीने पांढऱ्या ससाण्याचे पीस निवडले. त्याच्या पत्नीने आणि मुलाने त्याचे अनुकरण केले. ते तिघेही पांढरे ससाणे बनले. वॉपीने आपले पंख पसरले, त्याच्या पत्नीने आणि मुलानेही आपले पंख पसरले आणि इतर पक्ष्यांसोबत ते सगळे खाली पृथ्वीकडे उडू लागले. आजही त्यांना आपण पृथ्वीवर पाहू शकतो.



